


**महाराष्ट्र शासन**

**विधि व न्याय विभाग**

**शासन ज्ञापन क्रमांक- मोसाअ-१२२४/प्र.क्र.४६/का.०५**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १२ मार्च, २०२५

**विषय :- सन** २०२४-२५ अर्थसंकल्पीय अनुदान मागणी क्र. मागणी क्र. जे-५, मुख्यलेखाशीर्ष ७६१०, शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्जे, याखालील उपशीर्ष (२०२)(००)(०१) मोटारवाहन खरेदी अग्रिमे (७६१० ०४८१) नविन मोटार सायकल/स्कूटर खरेदी अग्रिम वाटप.

**संदर्भ :-** १) वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांकः अग्रिम-२०२२/प्र. क्र.३३/२०२२/ विनियम, दि. ९/११/२०२३.
२) विधि व न्याय विभाग, ज्ञापन क्रमांक. मोसाअ १२२४/प्र.क्र.४६/का.०५, दिनांक ०८/०४/२०२४, दि. १०/०४/२०२४, दि. १५/०५/२०२४, दि. ०५/०९/२०२४, दि. २५/०९/२०२४, दि.२७/०९/२०२४, दि.१६/१०/२०२४, २५/१०/२०२४ व दि. २९/११/२०२४.

**ज्ञापन :-**

मागणी क्र. जे-५, मुख्यलेखाशीर्ष ७६१०, शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्जे, याखालील उपशीर्ष २०२ मोटार वाहन खरेदीसाठी अग्रीम (दत्तमत) (२०२)(००)(०१) मोटार वाहन खरेदी अग्रिमे (अनिवार्य) (७६१० ०४८१) याकरिता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी मंजूर अनुदानातून सोबत जोडलेल्या विवरणपत्र “ब” मधील स्तंभ २ येथील नमूद अधिकारी/कर्मचारी यांना मोटार सायकल/स्कूटर खरेदी करण्यासाठी, स्तंभ ४ येथील नमूद नियंत्रक/मंजुरी अधिकारी यांना विवरणपत्र “अ” मधील स्तंभ ५ मध्ये दर्शविल्याप्रमाणे रु. १२,२१,०००/- (रुपये बारा लाख एकवीस हजार फक्त)) इतका निधी खालील नमूद अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रमाणित करण्यास शासनाची मंजुरी देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१) हा निधी, सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार, मुंबई वित्तिय नियम, १९५९ मधील नियम १३६,१३७ व १३९ च्या अधिन राहून, तसेच, वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक :- अग्रिम १०१३/प्र.क्र.१०/२०१३/विनियम, दि. २० ऑगस्ट, २०१४, तसेच, “शासन निर्णय क्रमांक अग्रिम-२०२२/प्र.क्र. ३३/२०२२/विनियम, दि.०९ नोव्हेंबर, २०२३ मधील सूचना व विहित नियम/अटींच्या अधीन राहून, तसेच, सदर शासन निर्णयातील तरतुदींचे काटेकोरपणे पालन करून, वितरित करण्याची दक्षता मंजुरी/नियंत्रक अधिकारी यांनी घ्यावी.

२) सर्व मंजुरी/नियंत्रक अधिकारी यांनी उपलेखाशीर्षनिहाय मासिक खर्चाचे नियोजन करुन अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे (BEAMS) तरतुदीचे वाटप आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना करावे. सदर अनुदानातून केला जाणारा खर्च मासिक निधी विवरणपत्रानुसार संगणकीय अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे (BEAMS) त्या त्या महिन्यांमध्ये करण्यात यावा व तो मंजूर तरतुदींच्या मर्यादेत करण्यात यावा.

३) अर्जदार खरेदी करणार असलेल्या मोटार सायकल/स्कूटरची किंमत प्रमाणित अग्रिमापेक्षा कमी असल्यास शिल्लक रक्कम तात्काळ शासनास परत करावा व तसे शासनास अवगत करण्यात यावे.

४) अर्जदारास त्याच्या नांवासमोर दर्शविलेल्या रकमेइतकेच अग्रिम मंजूर करावे. निर्देशिलेल्या अर्जदाराव्यतिरिक्त दुस-या कोणत्याही अर्जदारास हे अग्रिम देय होणार नाही.

५) संबंधित अधिकारी/कर्मचारी एखाद्या मंजुरी/नियंत्रक अधिकाऱ्यांच्या कार्यालयातून बदलून दुसरीकडे गेले असल्यास, अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर Authorisation Slip काढण्यापूर्वी, त्याबाबतचा तपशील शासनास कळविण्यात यावा. तदनंतर त्या अनुषंगाने, संगणक प्रणालीवर शासनाकडून आवश्यक ते बदल करण्यात आल्यानंतरच देयक तयार करण्याबाबतची पुढील कार्यवाही संबंधित कार्यालयाने करावी.

६) मोटार सायकल अग्रिम अधिकारी/कर्मचाऱ्यास त्यांच्या सेवा कालावधीत एकदाच देय राहील.

७) प्रमाणित केलेल्या रकमेचा विनियोग विहित कालावधीत न झाल्यास प्रमाणित केलेली रक्कम त्वरीत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी. तसेच काही कारणास्तव सदर अग्रिम मंजूर करण्यात येत नसेल अथवा नाकारण्यात येत असेल तर तसे या विभागास शासन निर्णय निर्गमित झाल्यापासून १० दिवसाच्या आत कळविण्यात यावे. अन्यथा याबाबतची संपूर्ण जबाबदारी संबधित मंजूरी/नियंत्रक अधिकारी यांची राहील.

८) प्रत्येक कार्यालयाने उद्दीष्ट निहाय केलेला दर महिन्याचा प्रत्यक्ष खर्च हा महालेखापाल यांच्या लेख्यामध्ये दर्शविण्यात आलेल्या खर्चाशी तंतोतंत जुळण्यासाठी http://agmaha.cag.gov.in या वेबसाईटवर दरमहा मासिक खर्चमेळाचे काम ऑनलाईन करण्यात यावे व पडताळणी केलेल्या खर्चाचे मासिक विवरणपत्र रिकंसिलीएशन कंप्लिशन स्लिपसह प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत या विभागाच्या कार्यासन ५/२४ कडे पाठविण्यात यावे.

९) नविन मोटार सायकल खरेदी करण्यासाठी मंजूर करण्यात येणाऱ्या अग्रिमाची वसूली व्याजासह ६० समान मासिक हप्त्यांमध्ये करण्यात यावी. प्रथम ४८ मासिक हप्त्यांमध्ये मुद्दल व नंतर १२ मासिक हप्त्यांमध्ये व्याज वसूल करण्यात यावे. तर नवीन स्कुटर खरेदी करण्यासाठी मंजूर करण्यात येणाऱ्या अग्रीमाची वसुली व्याजासह ४८ समान मासिक हप्त्यांमध्ये करण्यात यावी. प्रथम ३६ मासिक हप्त्यांमध्ये मुद्दल व नंतर १२ मासिक हप्त्यांमध्ये व्याज वसूल करण्यात यावे.

१०) अग्रिम व्याजाचा दर - वित्त विभाग शा.नि. क्र. अग्रिम २०२२/प्र.क्र.३३/२०२२/विनियम, दि. ०९/११/२०२३ अन्वये मोटार सायकल/स्कूटर/मोपेड करीता मंजूर करण्यात येणाऱ्या अग्रिम प्रकरणी व्याजाची परिगणना वार्षिक ९% या दराने करावी.

११) वाहनांचा विमा शासकीय विमा निधीकडे उतरविण्यात यावा व तो सतत चालू राहील याची दक्षता घेण्यात यावी.

१२) अग्रिमासाठी अर्ज करणाऱ्या अधिकारी/कर्मचारी यांची शासनाच्या सेवेतील नियुक्ती संबंधित पदाच्या सेवाभरती नियमानुसार करण्यात झाली असावी आणि नियुक्तीनंतर कमीत कमी ३ वर्षांची सलग सेवा झालेली असावी.

१३) अग्रिम मंजूर केलेल्या कार्यालयीन आदेशाच्या प्रतीसह अर्जदाराने अग्रिम त्याच कारणासाठी वापरल्याबाबतचे प्रमाणपत्र या विभागास त्वरेने पाठविण्यात यावे. तसेच खरेदीखत आणि गहाणखताच्या प्रती संबंधित अधिकारी / कर्मचारी यांचेकडून प्राप्त करुन घेऊन मंजूरी प्राधिका-यांनी आपल्या कार्यालयाच्या अभिलेखामध्ये जतन कराव्यात. संबंधित अर्जदारास अग्रीम मंजूरीच्या वेळी याबाबत आवश्यक त्या सुचना देण्यात याव्यात, अन्यथा, सदर प्रकरणी शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक अग्रीम-१०९५/ प्र.क्र.७०/ ९५/विनियम, दिनांक २६ सप्टेंबर, १९९७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

१४) अधिकारी/कर्मचारी यांना मंजूर करण्यात आलेल्या मोटार सायकल /स्कूटर अग्रिमाबाबत त्यांच्या सेवापुस्तकात त्याप्रमाणे नोंद घेण्यात यावी. नोंद घेतलेल्या सेवापुस्तकाच्या पृष्ठाची छांयाकिंत प्रत शासनास सादर करावी.

२. हा खर्च "मागणी क्र.जे-५ मुख्यलेखाशीर्ष ७६१०-शासकीय कर्मचारी इ.ना कर्जे, याखालील उपशीर्ष (२०२) (००) (०१) मोटार वाहने खरेदी अग्रीमे (संकेतांक ७६१० ०४८१) यासाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. मोटार वाहने खरेदी अग्रिमाची वसुली ७६१०-शासकीय कर्मचा-यांसाठी कर्जे इ., २०२-मोटार वाहनांच्या खरेदीसाठी आगाऊ रकमा (७६१० ५०२४) या जमाशीर्षाखाली जमा करावी व त्यावरील व्याज ००४९ व्याजाच्या जमा रकमा ८०० इतर जमा रकमा, (०१) (४५) (ii) मोटार वाहनांच्या खरेदीसाठी आगाऊ रकमा (००४९ १७४७) या जमाशीर्षाखाली जमा करावी.

४. वित्त विभाग शासन निर्णय क्रमांकः विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम (भाग-२), दि. १७ एप्रिल २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका -१९७८, भाग पहिला, उप विभाग-१ मधील अ.क्र.१२, मुंबई वित्तिय नियम-१९५९ मधील नियम क्र.१३६, १३७ व १३९ अन्वये प्रशासनिक विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन प्रधान सचिव व वरिष्ठ विधि सल्लागार तथा विभाग प्रमुख, विधि व न्याय विभाग यांच्या मान्यतेने प्रस्तुत शासन ज्ञापन निर्गमित करण्यात येत आहे.

५. प्रस्तुत शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०३१२१२१०४०३२१२ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GIRISH RAMLING SAGANE

Digitally signed by GIRISH RAMLING SAGANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=8a9b5d43113d71f5bfc96922b7f43ac6c2848591ed3e1f3401 9d8b33a3cdb267, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=17189CF8C13CB2294570F54627B6E879FDC09820CCB F3380ED23DA0258EA27C8, cn=GIRISH RAMLING SAGANE
Date: 2025.03.12 12:15:12 +05'30'

**( गि. रा. सगणे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**सहपत्रः- विवरणपत्र "अ" व "ब"**

**प्रति,**

१. प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव व वरिष्ठ विधि सल्लागार, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा ) महाराष्ट्र-१ मुंबई
4. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा ) महाराष्ट्र २, नागपूर
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. प्रमुख न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, नागपूर
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, परभणी/ औरंगाबाद/ लातूर/ ठाणे/गोंदिया/यवतमाळ/ नागपूर
११. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी/ औरंगाबाद/ लातूर/ ठाणे/गोंदिया/यवतमाळ/ नागपूर
१२. उप सचिव (आस्थापना), विधि व न्याय विभाग, मंत्रालय,मुंबई.
१३. सह सचिव (कार्या.५), विधि व न्याय विभाग, मंत्रालय,मुंबई
१४. वित्त विभाग, (व्यय-५ / विनियम / अर्थसंकल्प ७, १०) मंत्रालय, मुंबई.
१५. कार्यासन अधिकारी, (कार्या.२-अ/कार्यासन -२३ /कार्यासन २४) विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. निवडनस्ती (का.५), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.

| विवरणपत्र "अ" | | | | |
|---|---|---|---|---|
| शासन ज्ञापन, विधि व न्याय विभाग, क्र. मोसाअ १२२४/प्र.क्र.४६/का.पाच, दि. १२ मार्च, २०२५ सोबतचे विवरणपत्र ( रक्कम रुपयात) | | | | |
| अ. क्र. | CO / DDO code | नियंत्रक अधिकारी | प्रयोजन | मंजूर करावयाचे अग्रीम |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | J०००६ | प्रमुख न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, नागपूर | मोटर सायकल | १२०००० |
| २ | J००११ | जिल्हा न्यायाधीश-१ व अतिरिक्त सत्र न्यायाधीश, यवतमाळ | मोटर सायकल | २००००० |
| ३ | J००१२ | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, औरंगाबाद | मोटार सायकल | २३२५०० |
| ४ | J००१४ | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, परभणी | मोटार सायकल | १२३००० |
| ५ | J००१८ | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, लातूर | स्कूटर | १३५००० |
| ६ | J००२८ | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, ठाणे | मोटर सायकल | २०९००० |
| ७ | J००६० | उप सचिव (आस्था.), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई | मोटर सायकल | ९३५०० |
| ८ | J००७२ | प्रमुख जिल्हा न्यायाधीश, गोंदिया | स्कूटर | १०८००० |
| | | **(एकूण रुपये बारा लाख एकवीस हजार फक्त)** | | **१२२१०००** |

GIRISH RAMLING SAGANE

Digitally signed by GIRISH RAMLING SAGANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=8a9b5d43113d71f5bfc96922b7f43ac6c2848591ed3e1f34019d8b33a3cdb267, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=17189CF8C13CB2294570F54627B6E879FDC09820CCBF3380ED23DA0258EA27C8, cn=GIRISH RAMLING SAGANE
Date: 2025.03.12 12:15:35 +05'30'

( गि.रा. सगणे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

| विवरणपत्र "ब" | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| शासन ज्ञापन, विधि व न्याय विभाग, क्र. मोसाअ १२२४ /प्र.क्र.४६/का.पाच, दि. १२ मार्च, २०२५ सोबतचे विवरणपत्र, (रक्कम रुपयात) | | | | | | |
| अ.क्र. | अर्जदाराचे नाव | पदनाम | मंजूरी अधिकारी | प्रयोजन | प्रमाणित करावयाचे अग्रीम (रूपये) | शेरा |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्री. दिपक पिराजी शिंदे | कनिष्ठ लिपिक | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, ठाणे | मोटर सायकल | १०४००० | नियमानुसार |
| २ | श्री.संदिप रामराव पुंड | वरिष्ठ लिपिक | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, परभणी | मोटर सायकल | १२३००० | नियमानुसार |
| ३ | श्री. ज्ञानेश्वर सुखदेव वाढेकर | बेलिफ | प्रमुख जिल्हा न्यायाधीश, औरंगाबाद | मोटर सायकल | १२०५०० | नियमानुसार |
| ४ | श्री. व्यंकट शिवाजी कारले | कनिष्ठ | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, लातूर | स्कूटर | १३५००० | नियमानुसार |
| ५ | श्री. गोकुळ विश्राम गवांदे | लिपिक | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, ठाणे | मोटर सायकल | १०५००० | नियमानुसार |
| ६ | श्री. दिपक अशोक दांडगे | कनिष्ठ | प्रमुख जिल्हा न्यायाधीश, औरंगाबाद | मोटर सायकल | ११२००० | नियमानुसार |
| ७ | श्री. स्वप्निल उध्दवराव गणवीर | लिपिक | प्रमुख जिल्हा न्यायाधीश, गोंदिया | स्कूटर | १०८००० | नियमानुसार |
| ८ | श्री. निलेश रमेशराव तुरक | कनिष्ठ लिपिक | जिल्हा न्यायाधीश-१ व अतिरिक्त सत्र न्यायाधीश, यवतमाळ | मोटर सायकल | १००००० | नियमानुसार |
| ९ | श्री. मनोज माणिकराव मंगनाळे | कनिष्ठ लिपिक | जिल्हा न्यायाधीश-१ व अतिरिक्त सत्र न्यायाधीश, यवतमाळ | मोटर सायकल | १००००० | नियमानुसार |
| १० | श्री. प्रविण ईश्वर मेश्राम | शिरस्तेदार | प्रमुख न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, नागपूर | मोटर सायकल | १२०००० | नियमानुसार |
| ११ | श्री. नरसिंग दत्तू जाधव | लिपिक-टंकलेखक | प्रधान सचिव व व.वि.प., विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ | मोटर सायकल | ९३५०० | नियमानुसार |
| | | | **( एकूण बारा लाख एकवीस हजार फक्त)** | | **१२२१०००** | |

GIRISH RAMLING SAGANE

Digitally signed by GIRISH RAMLING SAGANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=8a9b5d43113d71f5bfc96922b7f43ac6c2848591ed3e1f340 19d8b33a3cdb267, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=17189CF8C13CB2294570F54627B6E879FDC09820CC BF3380ED23DA0258EA27C8, cn=GIRISH RAMLING SAGANE
Date: 2025.03.12 12:15:57 +05'30'

(गि. रा. सगणे)

अवर सचिव , महाराष्ट्र शासन